आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या वर्षात केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना-परंपरागत कृषि विकास योजनेकरीता निधी वितरण.
**(केंद्र हिस्सा-२४०१ अे ७६२)**
**(राज्य हिस्सा-२४०१ अे ७७१)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/प्र.क्र.०७/का-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ नोव्हेंबर, २०२०.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२० /प्र.क्र.६४/ अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२० /प्र.क्र.६५/ अर्थ-३, दि.०४.०५.२०२०.
३) केंद्र शासन,कृषि मंत्रालयाचे पत्र क्र. F.No.९-३५/२०१५-Org.Fmg(iii),दि.२८.०२.२०२० व दि.०८.०५.२०२०
४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. योजना ३३२०/प्र.क्र.८२/ १-अे.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १६ एप्रिल, २०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. तसेच संदर्भाधिन क्र. २ अन्वये वित्त विभागाने कार्यक्रमांतर्गत योजनांच्या ३३ टक्के मर्यादेत खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषी उन्नती योजना-परंपरागत कृषी विकास योजनेंतर्गत (NMSA) अनुसूचित जमाती घटकासाठी सन २०१९-२० या मागील वर्षातील प्रलंबित केंद्र हिस्सा रु.३४.५७ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.२३.०५ लाख वितरीत करण्याबाबत कृषी विभागाकडून संदर्भाधीन क्र.४ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन मधील कृषी उन्नती योजना-परंपरागत कृषी विकास योजनेंतर्गत (NMSA) सन २०२०-२१ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार २० टक्के मर्यादेत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील प्रलंबित केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा यासाठी पुढीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | सन २०२०-२१ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| १ | ३ | ४ | ६ |
| १ | कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषी विकास योजना ( केंद्र हिस्सा ) (२४०१अे७६२) | १६०.०० | **३२.००** |
| २ | कृषि उन्नती योजना- परंपरागत कृषी विकास योजना (राज्य हिस्सा) (२४०१अे७७१) | १०५.०० | **२१.००** |
| | **एकुण** | २६५.०० | **५३.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.५३.०० लाख (अक्षरी रुपये त्रेपन्न लाख फक्त) इतका** निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपूस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात मात्र फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५६१/व्यय-१४ दि.२२.१०.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२०१११७१७३९३७६६२४** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.11.18 12:14:46 +05'30'

**( किरण कि.पवार )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त ( कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग